GR-200410071220050001-1207

आदिवासी भागात लहान उपसा सिंचन योजना राबविण्याबाबत व त्यामध्ये स्वयंसेवी संस्थांचा तसेच सहकारी संस्थांचा सहभाग

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन पूरक पत्र क्रमांक उसियो १०९३/प्र.क्र.१३०/९४/जल-२अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ९ नोव्हेंबर, १९९४

**पूरक पत्र**

आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये आदिवासींच्या विकासासाठी लहान परंतु अक्षम अशा उपसा सिंचन योजना [किमान २५ हेक्टर पर्यंत सिंचन क्षेत्र असलेल्या] शासन खर्चाने बांधून देणे व त्यानंतर त्या लाभधारकांच्या सहकारी संस्थांकडे हस्तांतरित करण्याबाबत सविस्तर सूचना व मार्गदर्शक तत्वे शासनाच्या वरील दि. ३ फेब्रुवारी, १९९४ च्या आदेशान्वये निर्गमित करण्यात आलेली आहेत. सदर आदेशातील परिच्छेद क्र. ७[१] च्या ऐवजी पुढील परिच्छेद वाचावा :-

७[ ] आदिवासी उपयोजना क्षेत्रातील उपसा सिंचन योजनांचे सर्वेक्षण शासकीय सर्वेक्षण यंत्रणेमार्फत करण्यात येईल व सर्वेक्षणाचा खर्च प्रचलित पध्दतीनुसार उपलब्ध निधीतून करण्यात येईल. परंतु ५० हेक्टर सिंचन क्षमते पर्यंतच्या योजनांचे सर्वेक्षण सेवाभावी संस्था/सहकारी संस्था मार्फत करण्याची मुभा देण्यात येत आहे. मात्र अशा योजनांच्या प्राकलनांना तांत्रिक मान्यता ही परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे संबंधित सक्षम अधिकारी देतील. सर्वेक्षणासाठी संस्था पुढे न आल्यास सर्वेक्षणाचे काम शासकीय यंत्रणेमार्फत करण्यात येईल.

तसेच सदर आदेशातील परिच्छेद ७[७] च्या नंतर पुढील परिच्छेद ७[८] अंतर्भूत करण्यात येत आहे :-

[८] आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये उपसा सिंचन योजना कार्यान्वित झाल्यानंतर एका वर्षाकरीता शासकीय खर्चाने ही योजना राबविली जाईल. तद्नंतर संबंधित सहकारी संस्थेला हस्तांतरित करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[प. मो. पाटील]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री, पार्लमेंटरी सचिव
मुख्य सचिव
अतिरिक्त मुख्य सचिव
शासनाचे सर्व प्रधान सचिव/सर्व सचिव

..२/-